<नवनिर्मित पालघर जिल्हयासाठी रोजगार हमी योजना प्रभागांतर्गत जिल्हाधिकारी कार्यालयातील रोजगार हमी योजना कक्षासाठी पदे निर्माण करण्याबाबत...

# महाराष्ट्र शासन

नियोजन विभाग

शासन निर्णय क्रमांकः आस्थाप २०१४/प्र.क्र. १७२/मग्रारो-३

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,

मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.

तारीख: ०६ जुलै,२०१५

## वाचा

१) शासन निर्णय, नियोजन विभाग क्रमांकः आस्थाप-११०१/प्र.क्र. ८७/रोहयो-३, दि. २९.०५.२००१

२) शासन निर्णय, नियोजन विभाग क्रमांकः आवसं-२००९/प्र. क्र. १७७/मग्रारो-३, दि.०९.१२.२००९.

३) शासन निर्णय, नियोजन विभाग क्रमांकः आकृति-२०११/प्र.क्र.५/मग्रारो-३, दि. ३१.०५.२०११.

४) शासन शुध्दीपत्रक, नियोजन विभाग क्रमांकः आकृति-२०११/प्र.क्र.५/मग्रारो-३, दि. २२.०६.२०११

५) शासन शुध्दीपत्रक, नियोजन विभाग क्रमांकः आकृति-२०११/प्र.क्र.५/मग्रारो-३, दि. १८.०७.२०११

६) शासन निर्णय, नियोजन विभाग क्रमांकः गोअअ-२०१२/प्र.क्र.५६/मग्रारो-३, दि.०६.०२.२०१३.

७) शासन निर्णय, नियोजन विभाग क्रमांकः आस्थाप-२०१३/प्र.क्र.९/मग्रारो-३, दि.२०.०२.२०१३.

८) शासन निर्णय, नियोजन विभाग क्रमांकः आस्थाप-२०१३/प्र.क्र.९/मग्रारो-३, दि.१४.०३.२०१३.

९) शासन निर्णय, नियोजन विभाग क्रमांकः आस्थाप-२०१३/प्र.क्र.३/मग्रारो-३, दि. २४.०५.२०१३

१०) शासन निर्णय, नियोजन विभाग क्रमांकः गोअअ-२०१२/प्र.क्र.५६/मग्रारो-३, दि.०४.१२.२०१३

११) शासन अधिसूचना महसूल व वन विभाग क्रमांकः प्राफेब-११०८/प्र.क्र.१६७/ठाणे/म-१०, दि.३१.०७.२०१४.

## प्रस्तावना

महसूल व वन विभाग क्रमांक : प्राफेब-११०८/प्र.क्र. १६७/ठाणे/ म-१०, दिनांक ३१.०७.२०१४ च्या अधिसूचनेन्वये ठाणे जिल्हयाचे विभाजन करुन दिनांक ०१.०८.२०१४ पासून पालघर, वसई, डहाणू, तलासरी, जव्हार, वाडा, मोखाडा आणि विक्रमगड या तालुक्यांचा समावेश करुन पालघर जिल्हा निर्माण करण्यात आला आहे. त्याचे मुख्यालय पालघर येथे ठेवण्यात आले आहे. राज्यातील प्रत्येक जिल्हयासाठी जिल्हाधिकारी कार्यालयात, महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजनेच्या अंमलबजावणीसाठी संदर्भ क्रमांक ३ अन्वये पदसंख्या निश्चित करण्यात आली आहे व संदर्भ क्रमांक ९ अन्वये त्यामध्ये सुधारणा करण्यात आली आहे. सदर निश्चित केलेल्या आकृतीबंधानुसार नवनिर्मित पालघर जिल्हयासाठी जिल्हाधिकारी कार्यालयात रोजगार हमी योजना कक्षासाठी पदे निर्मित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय

नवनिर्मित पालघर जिल्हयासाठी जिल्हाधिकारी कार्यालयात, महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजना कक्षासाठी पदनिर्मिती करावयाच्या प्रस्तावाच्या अनुषंगाने, उच्चस्तरीय सचिव समितीने दिनांक १०.६.२०१५ रोजीच्या बैठकीत ठाणे जिल्हाधिकारी कार्यालयात, महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजना कक्षासाठी मंजूर असलेल्या १० पदांपैकी ५ पदे नवनिर्मित पालघर जिल्हाधिकारी कार्यालयाकडे वर्ग करण्यास व ५ पदे नव्याने निर्माण करण्यास मान्यता दिली आहे. त्यास अनुसरुन नवनिर्मित पालघर जिल्हयासाठी महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजनेच्या अंमलबजावणीसाठी जिल्हाधिकारी कार्यालयात रोजगार हमी योजना कक्षासाठी "प्रपत्र-अ" मध्ये दर्शविण्यात आलेली ५ पदे आदेशाच्या दिनांका पासून निर्मित करण्यात येत असून, "प्रपत्र-ब" मध्ये दर्शविण्यात आलेली जिल्हाधिकारी ठाणे कार्यालयातील महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजना कक्षासाठी मंजूर असलेल्या १० पदांपैकी ५ पदे नवनिर्मित पालघर जिल्हयातील जिल्हाधिकारी कार्यालयाकडे दिनांक १०.७.२०१५ पासून वर्ग करण्यात येत आहेत :-

**प्रपत्र-अ**

**जिल्हाधिकारी पालघर कार्यालयात रोजगार हमी योजना कक्षासाठी नव्याने निर्माण करावयाची पदे**

| अ.क्र. | पदनाम | वेतनश्रेणी (रुपयांत) | ग्रेड पे(रुपयांत) | पदांची संख्या |
|---|---|---|---|---|
| १ | उपजिल्हाधिकारी | १५६००-३९१०० | ५४०० | १ |
| २ | कनिष्ठ अभियंता (सा.बां.वि.) | ९३००-३४८०० | ४४०० | १ |
| ३ | सहाय्यक लेखाधिकारी | ९३००-३४८०० | ४४०० | १ |
| ४ | अव्वल कारकून | ५२००-२०२०० | २८०० | १ |
| ५ | लिपिक-टंकलेखक | ५२००-२०२०० | १९०० | १ |

**प्रपत्र-ब**

**जिल्हाधिकारी ठाणे कार्यालयातील रोजगार हमी योजना कक्षातील नवनिर्मित पालघर जिल्हयातील जिल्हाधिकारी कार्यालयातील रोजगार हमी कक्ष येथे वर्ग करावयाची पदे**

| अ.क्र. | पदनाम | वेतनश्रेणी (रुपयांत) | ग्रेड पे(रुपयांत) | पदांची संख्या |
|---|---|---|---|---|
| १ | उप अभियंता (जलसंपदा विभाग) | १५६००-३९१०० | ५४०० | १ |
| २ | नायब तहसिलदार | ९३००-३४८०० | ४३०० | १ |
| ३ | लघु टंकलेखक | ५२००-२०२०० | २४०० | १ |
| ४ | वाहन चालक | ५२००-२०२०० | १९०० | १ |
| ५ | शिपाई | ४४४०-७४४० | १३०० | १ |

२. लिपिक टंकलेखक या पदास मराठी व इंग्रजी या दोन्ही भाषेतील टंकलेखन/श्रुतलेखनाचे व संगणकाचे ज्ञान आवश्यक राहील.

३. नवनिर्मित पालघर जिल्हाधिकारी कार्यालयात महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजना कक्षासाठी नव्याने निर्माण करण्यात आलेल्या ५ पदांवरील अधिकारी/ कर्मचारी यांच्या नियुक्त्या संबंधित विभागांनी / विभाग प्रमुखांनी प्रतिनियुक्तीने/बदलीने तात्काळ कराव्यात. तसेच जिल्हाधिकारी, ठाणे कार्यालयातील पालघर जिल्हाधिकारी कार्यालयाच्या रोजगार हमी योजना कक्षासाठी वर्ग करण्यात आलेल्या पदांवर अधिकारी/कर्मचारी नियुक्त नसल्यास त्या पदावरील अधिकारी/कर्मचारी यांच्याही नियुक्त्या संबंधित विभाग/विभाग प्रमुखांनी प्रमुखांनी प्रतिनियुक्तीने/बदलीने तात्काळ कराव्यात

४. "प्रपत्र-ब" मध्ये दर्शविलेली पदे जिल्हाधिकारी ठाणे कार्यालयाने नवनिर्मित पालघर जिल्हयातील जिल्हाधिकारी कार्यालयाकडे दिनांक १०.७.२०१५ पासून वर्ग करावीत. सदर पदावरील नियुक्त्या संबंधित विभागांनी / विभाग प्रमुखांनी प्रतिनियुक्तीने तात्काळ कराव्यात.

५. जिल्हाधिकारी ठाणे कार्यालयासाठी पुढीलप्रमाणे ५ पदांचा सुधारित आकृतीबंध ठरविण्यात येत आहे.

| अ.क्र. | पदनाम | वेतनश्रेणी (रुपयांत) | ग्रेड पे(रुपयांत) | पदांची संख्या |
|---|---|---|---|---|
| १ | उपजिल्हाधिकारी | १५६००-३९१०० | ५४०० | १ |
| २ | कनिष्ठ अभियंता (सा.बां.वि.) | ९३००-३४८०० | ४४०० | १ |
| ३ | सहाय्यक लेखाधिकारी | ९३००-३४८०० | ४४०० | १ |
| ४ | अव्वल कारकून | ५२००-२०२०० | २८०० | १ |
| ५ | लिपिक-टंकलेखक | ५२००-२०२०० | १९०० | १ |

६. महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजनेवर कार्यरत अधिकारी / कर्मचारी यांचे गोपनीय अहवाल लिहिण्यासाठी प्रतिवेदन अधिकारी व पुनर्विलोकन अधिकारी संदर्भ क्रमांक ६ मध्ये नमूद करण्यात आलेल्या दिनांक ०६.०२.२०१३ च्या शासन निर्णयान्वये घोषित करण्यात आले आहेत. सदर शासन निर्णयातील तरतूदी नवनिर्मित पालघर जिल्हाधिकारी कार्यालयांतर्गत रोजगार हमी योजना कक्षामध्ये नियुक्त करण्यात येणारे अधिकारी / कर्मचारी यांना लागू राहतील. तसेच सदर आदेशाची अंमलबजावणी २०१५-१६ या वर्षापासून लागू राहिल.

७. मात्र जिल्हाधिकारी कार्यालयातील उप जिल्हाधिकारी (रोहयो) यांच गोपनीय अहवाल लिहिण्यासाठी जिल्हाधिकारी यांना प्रतिवेदन अधिकारी व आयुक्त, महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार

हमी योजना-महाराष्ट्र, नागपूर यांना पुनर्विलोकन अधिकारी म्हणून संदर्भ क्रमांक १० मध्ये नमूद करण्यात आलेल्या दिनांक ४.१२.२०१३ च्या शासन निर्णयान्वये घोषित करण्यात आले आहे. त्यानुसार उपजिल्हाधिकारी (रोहयो), पालघर यांचे गोपनीय अभिलेख लिहिताना कार्यवाही करण्यात यावी. सदर आदेशाची अंमलबजावणी २०१५-१६ या वर्षापासून लागू राहिल.

८. विभागाच्या अ.क्र. १ व २ येथील अनुक्रमे दिनांक २९.०५.२००१ व दिनांक ०९.१२.२००९ च्या शासन निर्णयानुसार महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजनेच्या कामासाठी उपजिल्हाधिकारी (रोहयो) यांना **"कार्यालय प्रमुख"** म्हणून घोषित करण्यात आले आहे. त्यानुसार उपजिल्हाधिकारी (रोहयो), पालघर यांना शासन निर्णय वित्त विभाग क्रमांक : विअप्र-१०.०८/प्र.क्र.७०/२००८/विनियम, दिनांक १५.०९.२००९ मधील अ.क्र. ३ नियम क्रमांक २ नुसार विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारान्वये **"कार्यालय प्रमुख"** म्हणून घोषित करण्यात येत आहे.

९. नवनिर्मित पालघर जिल्हाधिकारी कार्यालयातंर्गत नव्याने निर्माण करण्यात आलेल्या १० पदांच्या वित्तीय बाबी हाताळण्यासाठी उपजिल्हाधिकारी (रोहयो), पालघर यांना महाराष्ट्र कोषागार नियम १९६८, खंड-१ मधील अ.क्र. १५६ नुसार विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारान्वये "आहरण व संवितरण अधिकारी" म्हणून घोषित करण्यात येत आहे. तसेच त्यांना सदर पदाचे अधिकार अधिकार प्रदान करण्यात येत आहेत.

१०. महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजनेचे काम सुलभतेने पार पाडण्यासाठी तालुका स्तरावरील अव्वल कारकून संवर्गाच्या वित्तीय बाबी हाताळण्यासाठी संदर्भ क्रमांक ७ मध्ये नमूद करण्यात आलेल्या दिनांक २०.२.२०१३ च्या शासन निर्णयान्वये व संदर्भ क्रमांक ८ मध्ये नमूद करण्यात आलेल्या दिनांक १४.३.२०१३ च्या शासन शुध्दीपत्रकान्वये संबंधित उपजिल्हाधिकारी (रोहयो) यांना आस्थापनाविषयक बाबी हाताळण्यासाठी "आहरण व संवितरण अधिकारी" म्हणून घोषित करण्यात आले आहे. त्यानुसार पालघर जिल्हयातील तालुका स्तरावरील अव्वल कारकून संवर्गाच्या वित्तीय बाबी व आस्थापना विषयक बाबी हाताळण्यासाठी उपजिल्हाधिकारी (रोहयो), पालघर यांना महाराष्ट्र कोषागार नियम १९६८, खंड-१ मधील अ.क्र. १५६ नुसार विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारान्वये "आहरण व संवितरण अधिकारी" म्हणून घोषित करण्यात येत आहे. तसेच त्यांना सदर पदाचे अधिकार अधिकार प्रदान करण्यात येत आहेत.

११. नवनिर्मित पालघर जिल्हाधिकारी कार्यालयासाठी नव्याने निर्माण करण्यात आलेल्या १० पदांवरील खर्च "मागणी क्रमांक ओ-३, मुख्यशिर्ष-२५०५, ग्रामीण रोजगार-६०-इतर कार्यक्रम-००१ रोजगार हमी योजना-पंचवार्षिक योजनांतर्गत योजना-(०१)(०१) रोजगार हमी योजना (२५०५००२२) (खर्चाचे उद्दिष्ट संकेतांक-०१-वेतन) ( दत्तमत)" या लेखाशिर्षाखालील मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

१२. सदर आदेश वित्त विभागाच्या सहमतीने व त्या विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्रमांक : २९०/१५/व्यय-८, दिनांक २२.६.२०१५ व अनौपचारिक संदर्भ क्रमांक : १७१/विसु-१, दिनांक २९.६.२०१५ अन्वये व उच्चस्तरीय सचिव समितीने दिनांक १०.६.२०१५ च्या बैठक क्रमांक ९४ मध्ये दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

१३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०७०६१२३६३२८५१६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Prashant Ramesh Pimpale

Digitally signed by Prashant Ramesh Pimpale
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Section Officer, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Prashant Ramesh Pimpale
Date: 2015.07.06 16:01:29 +05'30'

**(प्रशांत र. पिंपळे)**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.

प्रत,

| | | | |
|---|---|---|---|
| १ | मा. राज्यपाल यांचे सचिव | २ | मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव |
| ३ | मा.मंत्री (रोहयो) यांचे खाजगी सचिव | ४ | अ.मु.स. (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई. |
| ५ | अ.मु.स.(नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई. | ६ | प्र.स. (ग्राम विकास) ग्र.वि.पं.रा.विभाग, मर्झबान पथ, बांधकाम भवन, फोर्ट. |
| ७ | सचिव (लेखा व कोषागारे) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई | ८ | सर्व विभागीय आयुक्त |
| ९ | सर्व जिल्हाधिकारी तथा जिल्हा कार्यक्रम समन्वयक, मगांरागांरोहयो (मुबई व मुंबई उपनगरे वगळून) | १० | सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद तथा सह जिल्हा कार्यक्रम समन्वयक मगांराग्रारोहयो. |
| ११ | मुख्य कार्यकारी अधिकारी ठाणे/पालघर | १२ | संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई |
| १३ | अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई | १४ | कोषागार अधिकारी ठाणे/पालघर |
| १५ | प्रधान महालेखासपाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई | १६ | प्रधान महालेखासपाल (लेखापरीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई |
| १७ | सर्व उप सचिव/अवर सचिव नियोजन विभाग (रोहयो), मंत्रालय, मुंबई | १८ | सर्व कार्यासन अधिकारी नियोजन विभाग (रोहयो), मंत्रालय, मुंबई |
| १९ | निवड नस्ती, मग्रारो-३ | | |